**समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील गृहपाल, गट-क संवर्गातून गृहप्रमुख, गट-ब संवर्गात तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन आदेश क्र.सकआ २०२२/प्र.क्र.१०७/आस्था-२,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १५ मार्च, २०२४

वाचा-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-एसआरव्ही-२०१८/प्र.क्र. १५९/कार्यासन-१२, दि. ०१.०८.२०१९
२) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र.सकआ/आस्था-५अ/गृहप्रमुख/पदोन्नती/२२-२३/का- ६ / ४०७९, दि. ०६.१०.२०२२
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन आदेश क्र. सकआ-२०२२/प्र.क्र. १०७/ आस्था-२, दि. ११.०५.२०२३
४) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र.सकआ/आस्था-५ब/गृहप्रमुख/पदोन्नती/विभागीय चौकशी माहिती/२०२३-२४/२९३७, दि. २४.०७.२०२३

**शासन आदेश-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवरील गृहपाल,गट-क (वेतन मॅट्रीक्स मधील वेतन स्तर एस-१४ : ३८६००-१२२८०० ) या संवर्गातील खालील कर्मचाऱ्यांना गृहप्रमुख, गट-ब (वेतन मॅट्रीक्स मधील वेतन स्तर एस-१५ : ४१८००-१३२३००) या संवर्गात खालील अटींच्या अधिन राहुन, तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | मूळ प्रवर्ग | गृहप्रमुख पदावर पदोन्नतीने पदस्थापने ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १ | श्री. श्रीनिवास नरसिंग सातारले, मागासवर्गीय मुलांचे शासकीय वसतिगृह कल्याण जि. ठाणे | विजा-अ | मुलांचे शासकीय वसतिगृह युनिट-२ आडगांव नाशिक (विभागीय स्तर) |
| २. | श्रीमती विजयश्री नामदेव वरुडे (श्रीमती विजयश्री प्रदिप बाबर) मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतीगृह खकवासला, जि. पुणे | विमाप्र | १२५ व्या जयंती निमित्त मुलींचे वसतिगृह, २५० मुलींचे विभागीय स्तरावरील शासकीय वसतिगृह नाशिक |

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | मूळ प्रवर्ग | गृहप्रमुख पदावर पदोन्नतीने पदस्थापने ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| ३. | श्रीमती कविता धोंडबाराव सुकळकर<br>मागासवर्गीय व आ. मा. मुलींचे शासकीय वसतिगृह, रायगड नगर, जि. नांदेड | खुला | मुलींचे शासकीय वसतिगृह, लातूर (विभागीयस्तर) युनिट क्रमांक-४ |
| ४. | श्रीमती सविता विठ्ठल मोघम<br>(साईयाना श्रीनिवास सातारले)<br>मागासवर्गीय व आ.मा. मुलींचे शासकीय वसतिगृह ठाणे | इमाव | २५० मुलांचे शासकीय वसतिगृह विश्रांतवाडी, पुणे (विभागस्तर) युनिट क्रमांक-३ |
| ५. | श्रीमती रमा नामदेव गोन्नाडे<br>(श्रीमती रमा अतुल बारापात्रे)<br>मागासवर्गीय मुलींचे शासकीय वसतिगृह पनवेल, जि.रायगड | अ.ज. | मुलींचे शासकीय वसतिगृह नागपूर (विभागस्तर) युनिट क्रमांक-४ |

२. खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून सदर निवडसूचीस मान्यता देण्यात येत आहे.-

१. निवडसूची तयार करताना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

२. मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि. २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि/१६-ब कार्यासनाच्या दि. ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दि. ७.५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायाल, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सहमती देण्यात येत आहे.

३. दिव्यांग कर्मचाऱ्यांना पदोन्नतीमध्ये आरक्षण देण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, १६-ब यांनी दि. २०.०४.२०२३ अन्वये दिलेल्या सुचनानुसार निवडसूचीस मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५. निवडसूचीतील ज्या अधिकाऱ्यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु असेल त्यांच्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. १५.१२.२०१७ व दि. ३०.०८.२०१८ नुसार कार्यवाही करावी.

६. निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि. ०१.०८.२०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषाची पूर्तता केली आहे. या अटीच्या अधिन राहून सदर निवडसूचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

७. सदर निवडसूचीतील सेवाज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि पदोन्नती नाकारलेल्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नती संदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि. १२.०९.२०१६ नुसार कार्यवाही करावी.

३. निवडसूचीतील सर्व अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी त्यांचेकडील कार्यभार अन्य कर्मचाऱ्याकडे सोपवून त्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित कर्मचाऱ्यांनी त्यांना पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन त्याबाबतचा रुजू अहवाल आयुक्त, समाज कल्याण पुणे व शासनास सादर करावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.Maharashtra .gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१८२५२५११२२ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH M KHAIRMODE

Digitally signed by SATISH M KHAIRMODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=a6351a2e14339ed095cda2a544af43de4b681afa9a5b92d3ad62ec4726ebebab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=79208454FA5609FCBFBE8A59A44EC2402F387AA627CD8748B6D2CFDDF68B76C6, cn=SATISH M KHAIRMODE
Date: 2024.03.15 18:34:25 +05'30'

**( सतीश खैरमोडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२. आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
३. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
४. उपायुक्त (प्रशासन) समाज कल्याण आयुक्तालय, पुणे
५. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८. सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण
९. सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१०.सर्व सह सचिव/उप सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११.मा.सचिव (सा.न्या.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२
१२.सर्व संबंधित अधिकारी (आयुक्त, समाज कल्याण पुणे यांचेमार्फत)
१३.आस्था -२ निवडनस्ती